**राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंना शासकीय, निमशासकीय व इतर क्षेत्रात नोकरीसाठी ५% आरक्षण**

**महाराष्ट्र शासन,**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः खेआक्ष-२७२५/प्र.क्र.३६/क्रीयुसे-२,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२
दिनांक: २८ मे, २०२५

**वाचाः**

१. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांकः राक्रीघो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक ०१ जुलै, २०१६,
२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांकः संकीर्ण -१७१७/प्र.क्र.३९/क्रीयुसे-२, दिनांक २७ मार्च, २०१७,
३. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांकः खेआक्ष-१७१९/प्र.क्र.१७६/क्रीयुसे-२, दिनांक २० जून, २०२४,
४. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, खेआक्ष-२७२५/प्र.क्र.३३/क्रीयुसे-२, १५ मे, २०२५,

**प्रस्तावना :-**

राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंना शासकीय, निमशासकीय व इतर क्षेत्रात नोकरीसाठी ५% आरक्षणाबाबतचे सुधारीत धोरण संदर्भाधिन दि.०१ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयान्वये विहीत केले आहे. तसेच, संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णयान्वये याबाबतच्या काही अटी व शर्ती सुधारीत करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार अमंलबजावणीकरताना निदर्शनास आलेले अनूभव व त्रुटी या सर्व बाबींचा साकल्याने विचार करून संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णयातील काही तरतूदींमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णय अधिक्रमीत करून संदर्भ क्र. १ येथील दिनांक ०१/०७/२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.**३. स्पर्धाविषयक अन्य अटी व शर्ती-३** (अ) मधील (iii),(iv),(v) व (vi) रद्द करुन त्या ऐवजी खालीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.

**३. स्पर्धाविषयक अन्य अटी व शर्ती- (अ)**

**(iii) राष्ट्रीय क्रीडा स्पर्धा (नॅशनल गेम्स) / राष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धा याः-**

१. भारतीय ऑलिम्पिक समितीशी (IOA) संलग्नता/मान्यता असलेली तसेच आंतरराष्ट्रीय ऑलिम्पिक समिती (IOC)/ऑलिम्पिक कौन्सिल ऑफ एशिया (OCA) या समितीशी संलग्नता/मान्यता असलेल्या आंतरराष्ट्रीय फेडरेशनशी संलग्न असलेल्या राष्ट्रीय क्रीडा संघटना यांनी आयोजित केलेल्या असाव्यात

**अथवा**

२. राष्ट्रीय क्रीडा संघटनेस भारतीय ऑलिम्पिक समितीची संलग्नता/मान्यता नसल्यास:- आंतरराष्ट्रीय ऑलिम्पिक समिती / ऑलिम्पिक कौन्सिल ऑफ एशिया (OCA) या समितीशी संलग्न असलेल्या आंतरराष्ट्रीय क्रीडा महासंघाशी/ ऑलिम्पिक कौन्सिल ऑफ एशिया (OCA) संलग्नता/मान्यता असलेली राष्ट्रीय क्रीडा संघटना यांनी आयोजित केलेल्या असाव्यात.

**अथवा**

३. राष्ट्रीय क्रीडा संघटनेवर एकापेक्षा अधिक कार्यकारिणी/संघटना कार्यरत असल्यास अथवा झाल्यासः आंतरराष्ट्रीय ऑलिम्पिक समिती/ऑलिम्पिक कौन्सिल ऑफ एशिया या समितीशी संलग्नता/मान्यता असलेल्या आंतरराष्ट्रीय फेडरेशनने संलग्नता दिलेल्या राष्ट्रीय कीडा संघटनेची कार्यरत असलेली कार्यकारिणी/संघटना अधिकृत समजल्या जाईल किंवा नियुक्त करण्यात आलेली समिती (Ad-hoc Committee) यांनी आयोजित केलेल्या असाव्यात.

**(iv )राज्य अजिंक्यपद क्रीडा स्पर्धा या-**

१. भारतीय ऑलिम्पिक समितीशी संलग्नता/मान्यता असलेल्या राष्ट्रीय फेडरेशनशी संलग्न असलेली व महाराष्ट्र ऑलिम्पिक समितीशी (MOA) संलग्नता/मान्यता असलेल्या राज्यातील एकविध खेळ राज्य संघटनेद्वारा आयोजित केलेल्या असाव्यात.

**अथवा**

२. एकविध खेळ राज्य संघटनेस महाराष्ट्र ऑलिम्पिक समितीची संलग्नता/मान्यता नसल्यास :- आंतरराष्ट्रीय ऑलिम्पिक समिती/ऑलिम्पिक कौन्सिल ऑफ एशिया, या समितीशी संलग्नता / मान्यता असलेल्या आंतरराष्ट्रीय फेडरेशनन/ ऑलिम्पिक कौन्सिल ऑफ एशिया (OCA) संलग्नता/मान्यता दिलेल्या राष्ट्रीय क्रीडा संघटनेव्दारा राज्यातील संलग्नता प्राप्त एकविध खेळ राज्य संघटना व्दारा आयोजित केलेल्या असाव्यात.

**अथवा**

३. राज्य क्रीडा संघटनेवर एकापेक्षा अधिक कार्यकारिणी/संघटना कार्यरत असल्यास अथवा झाल्यासः- आंतरराष्ट्रीय ऑलिम्पिक समिती/ऑलिम्पिक कौन्सिल ऑफ एशिया, या समितीशी संलग्नता / मान्यता असलेल्या आंतरराष्ट्रीय फेडरेशनने संलग्नता दिलेल्या राष्ट्रीय क्रीडा संघटनेव्दारा राज्यात संलग्नता दिलेली त्या-त्या खेळाची कार्यकारिणी/संघटना किंवा नियुक्त समिती (Ad-hoc Committee) यांनी आयोजित केलेल्या असाव्यात.

(v) ज्या खेळाचा समावेश ऑलिम्पिक, एशियन गेम्स व कॉमनवेल्थ गेम्स यापैकी कोणत्याही एका स्पर्धांमध्ये आहे अशा खेळांचे बाबतीत उपरोक्त तरतूदी लागू राहतील.

२. ५ टक्के खेळाडू आरक्षणासंदर्भातील वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयातील अन्य तरतुदी तशाच लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय हा ५% खेळाडू आरक्षणाअंतर्गत खेळाडूंद्वारे आगामी दाखल करण्यात येणारे अर्ज, संबंधित उपसंचालक (क्रीडा) यांचे कडे पडताळणीसाठी (Verification) केलेले अथवा प्रलंबित अर्ज, सहसंचालक (क्रीडा) यांचेकडे केलेले प्रथम अपील, आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्याकडे केलेले द्वितीय अपील या प्रकरणांना तसेच क्रीडा संचालनालयाकडे पुनर्पडताळणीसाठी प्रलंबित असलेल्या व मा. उच्च न्यायालय अथवा मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाकडे या शासन निर्णयापूर्वी दाखल असलेल्या याचिका या सर्व प्रकरणांना देखील लागू राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२८१८१०४१२६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Scl Edu Sports Dept, 2.5.4.20=7F874792415B92BA519384CACB41B53A89CF93DBD96D4BE1F7D97FB6326EED47, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2025.05.28 18:13:06 +05'30'

**(सुनिल पांढरे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव,

२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधानसचिव,

३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४. विरोधी पक्षनेता विधानसभा/विधान परिषद यांचे खाजगी सचिव

५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय मुंबई,

६. अ.मु.स/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
७. अ.मु.स. (क्रीडा-अ.का.) मंत्रालय मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त, (महसूल)
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई,
१०.आयुक्त, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११.आयुक्त, (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२.संचालक, शिक्षण (प्राथमिक/माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
१४.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (पत्राने)
१५.लोकायुक्त, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई (पत्राने)
१६.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१७.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१८.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१९.सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा.
२०.निवडनस्ती (क्रीयुसे-२)